**महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून नारायणा व्यायाम शाळा व क्रीडा मंडळ, औरंगाबाद व महाराष्ट्र बुध्दीबळ असोसिएशन या संस्थांना स्पर्धा आयोजनाकरिता आर्थिक सहाय्य करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मराक्रीप-२०२४/प्र.क्र.१८/क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १५ मार्च, २०२४.

**वाचा:-**

१. समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.राक्रीधो १०९६/ प्र.क्र.३३०/क्रीयुसे-१, दि. ३१/७/१९९७
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र. राक्रीप-१३११/प्र.क्र.७०/क्रीयुसे-३ दि. ४/७/२०१२.
३. क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक मराक्रीप/स्प.अ. सहाय्य/प्रस्ताव/२०२३-२४/ का-६/४९७३, दिनांक १९ जानेवारी, २०२४

**प्रस्तावना :-**

राज्यातील क्रीडा व खेळाच्या विकासासाठी विविध स्तरावर कार्यरत असलेल्या नोंदणीकृत संस्था/संघटनांना संदर्भाधिन क्र. १ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील नियम क्र. ११, १२, व १३ अन्वये शासनातर्फे महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून अधिकृत राज्य/राष्ट्रीय /आंतरराष्ट्रीय स्पर्धा आयोजनाकरिता आर्थिक सहाय्य देण्यात येते. त्यानुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता खाली नमूद क्रीडा संस्थांना एकूण रू. ४.०० लक्ष ( अक्षरी रूपये चार लक्ष फक्त.) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील क्रीडा व खेळाच्या विकासासाठी विविध स्तरावर कार्यरत असलेल्या नोंदणीकृत संस्था/ संघटनांना महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून अधिकृत राज्य/राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय स्पर्धा आयोजनाकरिता आर्थिक सहाय्य देण्यात येते. त्यानुसार खालील तक्त्यात नमूद क्रीडा संस्थांना एकूण रू. ४.०० लक्ष ( अक्षरी रूपये चार लक्ष फक्त.) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव | खेळ | स्पर्धेचा तपशिल | अनुज्ञेय रक्क |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | नारायणा व्यायामशाळा व क्रीडामंडळ, औरंगाबाद | सॉफ्टबॉल | २८ वी राज्यस्तर सॉफ्टबॉल वरिष्ठ स्पर्धा दि.२८.०१.२०२३ ते ३१.०१.२०२३ विभागीय क्रीडा संकुल, गारखेडा, औरंगाबाद | रु. १,००,००० |
| २ | नारायणा व्यायामशाळा व क्रीडामंडळ, औरंगाबाद | सॉफ्टबॉल | २८ वी राज्यस्तर सॉफ्टबॉल वरिष्ठ स्पर्धा दि.१५.११.२०२२ ते १८.११.२०२२ विभागीय क्रीडा संकुल, गारखेडा, औरंगाबाद | रु. १,००,००० |
| ३ | महाराष्ट्र बुध्दीबळ असोसिएशन | बुध्दीबळ | ६० वी राष्ट्रीय खुल्या बुध्दीबळ स्पर्धा दि.१६.०८.२०२३ ते २६.०८.२०२३ | रु. २,००,००० |
| | एकूण रुपये रु. ४,००,०००/- | | | |

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.१२/०४/२०२३ मधील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा)यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. प्रस्तुत खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात (२) (३) महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेमार्फत नोंदणीकृत क्रीडा संस्थांना सहायक अनुदान (राज्य) (कार्यक्रम) (२२०४-१९४३) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली वितरणासाठी उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून भागविण्यांत यावा. सदरचे

अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. तसेच, वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२३१७०८६६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=a022aa350b02721b783553b5f04e9a637bb746c09f7ca3701d55e5feb1b5b141, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=01B315F80D517C9B1A66011D10F7F68624DB9044C98A741CFD0A1AEF85A9F714, cn=SHAILA BABAN YADAV
Date: 2024.03.15 23:26:54 +05'30'

**(शैला ब. यादव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल ( लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल ( लेखा व परीक्षा ), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
४. संबंधित विभागीय उप संचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
५. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे
६. संबंधित वरीष्ठ कोषागार अधिकारी/जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)
७. संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
८. वित्त विभाग (व्यय-५)/ नियोजन विभाग (का. १४७१), मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव, नारायणा व्यायाम शाळा व क्रीडा मंडळ, औरंगाबाद
११. सचिव, महाराष्ट्र बुध्दीबळ असोसिएशन
१२. निवड नस्ती (क्रीयुसे-३ )